**केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करिता समन्वय अधिकारी (Nodal Officer) व एकमेव समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-बीजीटी-२०१८/प्र.क्र. ५७ /का-४**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०८ एप्रिल,२०२४ .

**वाचा :-**

१. वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.१(१३)/ PFMS/FCD/२०२०, दि.२३.३.२०२१.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२१२१/प्र.क्र.३५/कोषाप्रशा-४, दि.१.७.२०२१.
३. केंद्र सरकारचे पत्र सी. ११/१३/२०२३-CD- दि.१४.१२.२०२३
४. मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीच्या दिनांक २२.०२.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त
५. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एबावि -२०२३/प्र.क्र.३७७ /का-६ दि.०५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत योजनांचे परिणामकारक व्यवस्थापन करणे, तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२३.३.२०२१ रोजीच्या ज्ञापनान्वये सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरुन वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१.७.२०२१ रोजीच्या परिपत्रकान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (Public Finance Management System- PFMS) बाबत सुधारित सूचना दिलेल्या आहेत. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एकमेव समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) तसेच किमान उपसचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे.

त्यानुसार केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) योजनेकरिता समन्वय अधिकारी (Single Nodal Officer) व समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

महिला व बाल विकास विभागाच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) करिता समन्वय अधिकारी (Nodal Officer) व एकमेव समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) खालीलप्रमाणे घोषित करण्यात येत आहेत. :-

| अ.क्र. | योजनेचे नाव | समन्वय अधिकारी (Nodal Officer) | एकमेव समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) |
|---|---|---|---|
| | प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (PM JANMAN) | सह/ उप सचिव (कार्यासन- ६ ) | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई |

२. केंद्र पुरस्कृत योजनांकरिता सुधारित कार्यपध्दतीनुसार निधी प्राप्त होणार आहे. त्यामुळे उपरोक्त विवरणपत्रातील नियुक्त समन्वय अधिकारी (Nodal Officer) व एकमेव समन्वय यंत्रणा (Single Nodal Agency) यांनी केंद्र पुरस्कृत योजनांच्या अनुषंगाने निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन बाबत केंद्र शासन तसेच वित्त विभागाच्या दिशानिर्देशांचे काटोकोर पालन करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०४०८१२४५१२७४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aab126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C14BADBE6832D77601CF425AA7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2024.04.08 13:07:31 +05'30'

( सुनिल सरदार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, बांद्रा, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र राज्य समाजकल्याण बोर्ड, चेंबूर, मुंबई
६. सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी, मुंबई
७. उप आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
८. उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे

९. उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०.सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास)
११.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१२.सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
१३.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१४.महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.अवर सचिव/ कक्ष अधिकारी ( कार्यासन-२, ३, ४, ५, ६, ७, ७-अ, ८, ९ , १०, ११) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती, का-४.